**नागपूर, औरंगाबाद आणि अमरावती विभागातील काही जिल्ह्यातील सोयाबीन पिकावरील लष्करी आळीच्या प्रादुर्भावामुळे पिकांचे नुकसानीपोटी आपदग्रस्तांना मदत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे
मंत्रालय,मुंबई-४०००३२,
दिनांक : २४ जानेवारी ,२०११

**वाचाः-**

अ) शासन निर्णय महसूल व वन विभाग,क्रमांकः
१) सीएलएस-०९०८/प्र.क्र.२४२/म-३,दिनांक १२ सप्टेंबर,२००८
२) एससीवाय-१०/२००८/प्र.क्र.१५१/म-११, ,दिनांक ६ ऑक्टोबर, २००८
३) सीएलएस-०९०८/प्र.क्र.२४२/म-३,दिनांक १३ सप्टेंबर,२००८
४) एससीवाय-१०/२००८/प्र.क्र.१५१/म-११, दिनांक २१ ऑक्टोबर, २००८
५) एससीवाय-१०/२००८/प्र.क्र.१५३/म-११, दिनांक १४ नोव्हेंबर, २००८
६) एससीवाय-१०/२००८/प्र.क्र.१५७/(भाग-२)/म-११, दिनांक २४ फेब्रुवारी, २००९
७) एससीवाय-१०/२००८/प्र.क्र.१५७/म-११, दिनांक ३० मार्च, २००९
८) एससीवाय-१०/२००८/प्र.क्र.१५७/म-११, दिनांक ३१ मार्च, २००९
९) सीएलएस-०७/२००९/प्र.क्र.६६/म-११, दिनांक ३० जुलै,२००९
१०)एससीवाय-०१/२०११/प्र.क्र.५/म-११, दिनांक २० जानेवारी,२०११

ब) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग , क्रमांक -
१) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक ०८ ऑक्टोबर, २००८
२) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
३) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक १८ नोव्हेंबर, २००८
४) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक २५ फेब्रुवारी, २००९
५) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक ३० मार्च, २००९
६) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक ३१ मार्च, २००९
७) नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दिनांक ३० जुलै, २००९

**शासन निर्णयः-**

सन २००८ मध्ये नागपूर, औरंगाबाद आणि अमरावती विभागातील काही जिल्ह्यातील सोयाबीन व इतर पिकावरील लष्करी आळीच्या प्रादुर्भावामुळे शेतीपिकांचे मोठया प्रमाणावर नुकसान झाले होते. नागपूर, औरंगाबाद व अमरावती विभागातील बाधीत जिल्ह्यांकरीता आपदग्रस्त शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी आतापर्यंत एकूण रु.४४९.५३ कोटी इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे. आपदग्रस्त शेतकऱ्यांना मदत वाटप करण्यासाठी आणखी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२.	सन-२००८ मध्ये नागपूर, औरंगाबाद व अमरावती विभागातील सोयाबीन पिकावरील लष्करी आळीच्या प्रादुर्भावामुळे शेतीपिकांचे झालेल्या नुकसानीबाबत आपदग्रस्त शेतकऱ्यांना शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार मदत देण्यासाठी महसूल व वन विभागाने यापूर्वी रु.४४९.५३ कोटी रकमेचे वितरण केले आहे. आता प्रलंबित असलेल्या मागणीपोटी रु.६५.०० कोटी ( रुपये पासष्ट कोटी फक्त) इतके अनुदान संदर्भांकित अनुक्रमांक १० येथील दि.२० जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिले असून कृषि विभागास सदर अनुदान खर्च करण्यास प्राधिकृत केले आहे. सदर अनुदान रु.६५.०० कोटी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२.१	आपदग्रस्त शेतकऱ्यांना वरीलप्रमाणे मदत देण्यासाठी "मागणी क्रमांक सी-६, २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य- ०२-पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१-अनुग्रह सहाय्य (०४) सवलती (०४)(०५) इतर बाबी, ३१-सहाय्यक अनुदाने (२२४५ ०२४४) (दत्तमत) (योजनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन-२०१०-११ या वर्षाकरीता उपलब्ध झालेल्या रु.६५.०० कोटी ( रुपये पासष्ट कोटी फक्त) अनुदानाची रक्कम चालू वित्तीय वर्षात सन -२०१०-११ मध्ये खर्च करण्यासाठी आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच या निधीचे बीड,लातूर,उस्मानाबाद,परभणी,हिंगोली व यवतमाळ या जिल्हयांना जिल्हानिहाय वितरण करण्यास आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२.२	सदर रुपये ६५.०० कोटी रक्कम महसूल व वन विभागाने अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे ( B.D.S.) उपलब्ध करुन दिली आहे. सदर अनुदानाचे वाटप लाभार्थ्यांना १५ दिवसांचे आत करावे . कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रण अधिकाऱ्यांनी घ्यावी. त्याचप्रमाणे खर्च झालेल्या रकमेचे विवरण महसूल व वन विभाग तसेच या विभागास प्रत्येक आठवड्यास न चुकता पाठवावे. अनुदान वाटपासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत या विभागास पाठविण्यात यावे.

२.३	अनुदान वाटपाची प्रत प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) , महसुल व वन विभाग तसेच या विभागास नियंत्रण अधिकाऱ्यांनी न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार / उपकोषागार यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या बीलासोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण/उपशीर्षाच्या गणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा असे आदेश संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत. तसेच, कोषागारातून / उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

३.	वरीलप्रमाणे आपदग्रस्त शेतकऱ्यांना द्यावयाची मदत वाटप करतांना अनुसरावयाची पध्दत संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णय क्र.नैसआ-१००८/प्र.क्र.१८७/१०-अे, दि.८ ऑक्टोबर२००८ व अ.क्र.२ येथील नैसआ-१००८/प्रक्र.१८७/१०-अे दि. २२ ऑक्टोबर, २००८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

४.	हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या शासन निर्णय क्र. एससीवाय-०१/२०११/प्र.क्र.५/म-११, दि.२० जानेवारी, २०११ अन्वये त्या विभागाने कृषि विभागास प्राधिकृत केल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेवसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११०१२४१६०००९००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( वा.म. तुरूकमाने )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

**आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य,पुणे.**

**विभागीय आयुक्त,औरंगाबाद/अमरावती/नागपूर विभाग.**
**सर्व संचालक/सहसंचालक,कृषि आयुक्तालय,पुणे.**
**विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद विभाग, लातूर विभाग , अमरावती विभाग, नागपूर विभाग.**
**महालेखापाल महाराष्ट्र राज्य-१/२,मुंबई/नागपूर.**
**जिल्हाधिकारी, बीड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, हिंगोली, यवतमाळ**
**मुख्य कार्यकारीअधिकारी, जिल्हापरिषद, बीड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, हिंगोली, यवतमाळ**
**जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बीड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, हिंगोली, यवतमाळ**
**जिल्हा कोषागार अधिकारी, बीड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, हिंगोली, यवतमाळ**
**कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद, बीड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, हिंगोली, यवतमाळ**
**महसूल व वन विभाग (म-३, म-११)**
**वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प १३ अर्थोपाय)**
**सहसंचालक,लेखा व कोषागारे,**
**संगणक कक्ष,५ वा मजला,नवीन प्रशासन भवन,मुंबई-३२**
**सर्व सहसचिव/उप सचिव/अवरसचिव कृषि व पदुम विभाग**
**विभागातील सर्व कार्यासन अधिकारी,**

**प्रतः**

**मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव**
**मा.मुख्य सचिव/सर्व विभागांचे प्रधान सचिव/सचिव**
**मा.मंत्री (कृषि)यांचे खाजगी सचिव**
**सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव**
**ग्रंथपाल,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,ग्रंथालय सहावा मजला,विधान भवन,मुंबई-३२**
**माहिती जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई-३२**
**निवडनस्ती.**